वैध मापन शास्त्र यंत्रणतील निरीक्षक, वैध मापन शास्त्र या पदावरुन सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - वैमाशा - २०२२/प्र.क्र.२०/ग्रासं-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ०९ जून, २०२३

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या निवडसूची वर्षात वैध मापन शास्त्र यंत्रणेतील खालील निरीक्षक, वैध मापन शास्त्र, गट-ब (राजपत्रित) यांना सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र, गट -ब (राजपत्रित) या पदावर या आदेशाव्दारे विहित अटींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विचारक्षेत्रातील अधिका-यांची नावे | प्रवर्ग वैधता |
|---|---|---|
| १ | श्री. सा. कि. त्रिभुवन | अजा |
| २ | श्री. जी. बी. मिसाळ | भज-ड |

०२. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र. २७९७/२०१५ मध्ये दि. ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेली विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६ / २०१७ याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन १६ ब यांच्या शासन निर्णय दिनांक ०७.०५.२०२१ मधील तरतुदीनसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दिनांक २५.०५.२००४ च्या स्थितीनूसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहून भरण्यात येत आहेत.

०३. सदर निरीक्षकांची सहायक नियंत्रक पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

१) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नती राहिल.

२) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधीत अधिका-यांचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

३) सन २०२२-२३ या निवडसूची वर्षाकरीता पात्र निरीक्षक, वैध मापन शास्त्र यांच्या सहायक नियंत्रक या पदावरील पदोन्नत्या या तात्पुरत्या स्वरुपाच्या आहेत. परिणामी निवडसूचीतील अधिका-यांना नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) सदर पदोन्नत्या तात्पुरत्या स्वरुपाच्या असून त्या केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणा-या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

५) संबंधीत निरीक्षक, वैध मापन शास्त्र यांनी सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र पदावरील तात्पुरती पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५ /

प्र.क्र.३०३/ का.१२, दि १२.०९.२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०२२-२३ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणा-या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिस-या वर्षाच्या निवडसूचीत सहायक नियंत्रक पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

६) सदर अधिका-यांची सहायक नियंत्रक पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिका-यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

७) सदर आदेश हे आदेशाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

८) सहायक नियंत्रक पदावरील पदोन्नती ही अकार्यात्मक पदोन्नती असल्याने संबंधित अधिका-यांच्या पदस्थापनेमध्ये कोणतेही बदल होणार नाहीत.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०६०९१५४६५१५३०६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND PADMANABH SHENOY

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a45302e7be40ef2fa6a43ca3b215a6542fe92b8f994959680f52a7ae3a293948, pseudonym=99708A500F64BB4AD98104DBFA1ABDF012AE500C, serialNumber=F493AF30AF7B26C53298AE259841E86E196988EEE98D450625570240B6F3B989, cn=MILIND PADMANABH SHENOY
Date: 2023.06.09 15:49:19 +05'30'

**( मिलिंद शेणॉय )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व संबंधीत सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
(नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांचे मार्फत)

**प्रत,**

१) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई महानगर विभाग/नागपूर विभाग/ अमरावती विभाग/ औरंगाबाद विभाग/पुणे विभाग / नाशिक विभाग
३) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
६) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.